**पर्यावरण व वातावरणीय बदल विभागांतर्गत "राज्य वातावरणीय कृती कक्ष (State Climate Action Cell (SCAC))" निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : वाकृक-२०२३ / प्र.क्र. ५४ /तां.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक: ९ ऑगस्ट, २०२३

**<u>प्रस्तावना:</u>**

पर्यावरणातील वातावरणीय बदलाचे महत्व लक्षात घेता, पर्यावरण विभागाचा "पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग" असा नामबदल करण्यात आला असून, हा विभाग आता पर्यावरण विषयक विविध अधिनियमांच्या अंमलबजावणी बरोबरच वातावरणीय बदल अनुकुल धोरणाची अंमलबजावणी करणे, जैवविविधता आणि वातावरणाचा समतोल राखण्यासाठी नैसर्गिक जलस्त्रोतांचे संरक्षण व संवर्धन करणे तसेच, शाश्वत विकासाचे ध्येय साध्य करण्यासाठी विविध उपाययोजना राबविणे इत्यादी कार्य करीत आहे.

२. राज्य वातावरण कृती आराखडा (State Action Plan for Climate Change (SAPCC)) सन २०१४ मध्ये तयार करण्यात आला होता. केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व वातावरणीय बदल विभागाच्या सूचनांनुसार सदर राज्य वातावरण कृती आराखडा सुधारित करण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यात असून या आराखड्याची तसेच वातावरणीय बदल अनुकूल धोरणांची प्रभावी अंमलबजावणी करून शाश्वत विकासाचे ध्येय साध्य करणे आवश्यक आहे.

३. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागांतर्गत मंत्रालयस्तरावर असलेल्या सध्याच्या यंत्रणेमार्फत पर्यावरण विषयक विविध अधिनियमांची अंमलबजावणी कालमर्यादेत करण्यात येत असून त्यासाठी विभागात उपलब्ध असेलेल्या मनुष्यबळाचा वापर करण्यात येत आहे. परंतु, विभागाचे नामबदल झाल्यानंतर वातावरणीय बदल अनुकुल धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी स्वतंत्र असा अधिकारी व कर्मचारीवृंद उपलब्ध नाही. तथापी, वातावरणीय बदल अनुकुल धोरणाची अंमलबजावणी प्रभावीपणे करणे ही आता काळाची गरज आहे. त्यामुळे, वातावरणीय बदल अनुकुल धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरावर "राज्य वातावरणीय कृती कक्ष (State Climate Action Cell (SCAC))" निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून वातावरणीय बदल अनुकूल धोरणांची अमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरावर पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या अंतर्गत "**राज्य**

**वातावरणीय कृती कक्ष** (State Climate Action Cell (SCAC))” निर्माण करण्यास व त्याकक्षासाठी खाली नमूद केलेला अधिकारी व तज्ञ यांची पदे तात्पुरत्या स्वरूपात महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्यास्तरावर निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| (अ) | संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष | १ पद |
| (ब) | वातावरणीय वित्त तज्ञ (Climate Finance Expert) | १ पद |
| (क) | वातावरणीय शमन तज्ञ (Climate Mitigation Expert) | १ पद |
| (ड) | वातावरणीय अनुकूलन तज्ञ (Climate Adaptation Expert) | १ पद |
| (इ) | प्रकल्प सल्लागार / अधिकारी (Project Consultant/ Officer) | १ पद |

२. संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष हे राज्य वातावरणीय कृती कक्षाचे प्रमुख हे असतील. ते प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल यांच्या मार्गदशनाखाली व पर्यवेक्षीय नियंत्रणाखाली काम करतील.

३. उपरोक्त (अ) येथील संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष हे पद महसूल संवर्गातील उप जिल्हाधिकारी किंवा त्यावरील दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने भरण्यात यावे. तर, उपरोक्त (ब), (क), (ड) व (इ) येथील पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यात यावीत. या सर्व कंत्राटी पदांसाठी आवश्यक शैक्षणिक आर्हता, अनुभव व मानधन याबाबी प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या मान्यतेने ठरवून त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. उपरोक्त (अ) येथील संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष या पदाचे वेतन व भत्ते तसेच, (ब), (क), (ड) व (इ) येथील कंत्राटी कर्मचारी यांचे मानधन व भत्ते महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या निधी मधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. **राज्य वातावरणीय कृती कक्षाचे (SCAC) ची प्रमुख कामे पुढील प्रमाणे राहतील:**

१) वातावरणीय बदलाच्या कृतीमध्ये येणाऱ्या प्रतिबंध (Prevention), अनुकूलन (Adaptation) आणि शमन (Mitigation) या तीन मुख्य बाबींवर लक्ष केंद्रित करणे.

२) राष्ट्रीय वातावरणीय कृती आराखडा (NAPCC), राज्य वातावरणीय कृती आराखडा (SAPCC) आणि मिशन लाईफची (LIFE) अंमलबजावणी यासाठी राज्यातील संबंधित विभाग व स्थानिक स्वराज्य संस्थांना मार्गदर्शन करणे व अंमलबजाणीचे देखरेख करणे.

३) केंद्र शासन, स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था (एनजीओ), पर्यावरणाशी संबंधित संशोधन आणि विकास संस्था आणि आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था, विविध भागधारक संस्था यांच्याशी समन्वय साधणे.

४) वातावरणीय कृती आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी विविध भागधारकांशी सल्लामसल करणे. यामध्ये तज्ञ, कॉर्पोरेट आणि इतर संस्थांचा समावेश राहील.

५) जिल्हा वातावरणीय कृती आराखड्याच्या अंमलबजावणीवर देखरेख ठेवणे.

६) राज्यातील वातावरणीय बदलाशी संबंधित माहिती संकलित करणे व त्या आधारे उपाययोजना राबविण्यासाठी सूचित करणे.

७) राज्याचे हरित उपक्रम सुरू करण्यासाठी समन्वय संस्था (नोडल एजन्सी) म्हणून कार्य करणे.

८) वातावरणीय बदलाबाबत जनजागृती करणे.

९) प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणी बदल विभाग नेमून देतील ती कामे करणे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८०९१७३३१६५६०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2023.08.09 17:35:09 +05'30'

**( सु. कि. निकम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. मा. अपर मुख्य सचिव, महसूल, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
१३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१४. मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व विभागीय आयुक्त
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
२०. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
२१. निवडनस्ती.